**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे तिर्थपुरी (ता. धनसावंगी, जि. जालना) नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२१/प्र.क्र.२९/पापु-१९**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २३ मार्च, २०२२

**वाचा**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्रमांक जिपजा/ग्रापापुवि/प्रशा/कावि/२०१८, दि. १०.०९.२०१८

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांचा सुधरित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव क्रमांक जिपजा/ग्रापापुवि/ प्रशा/२५८/२०२१, दि. २५.०३.२०२१

३) वित्त विभाग, पत्र क्र. व्यअस२०२२/प्र.क्र.३१/अर्थ-०२ , दि. १०.०३.२०२२

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे तिर्थपुरी,( ता. धनसावंगी, जि. जालना) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१५५.४६ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. १ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तथापि, सदर योजनेच्या वितरण व्यवस्थेमध्ये वाढ झाल्याने व प्रत्यक्ष कामादरम्यान काही तांत्रिक बदल करणे आवश्यक असल्याने योजनेच्या किंमतीत वाढ झाली आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. जालना यांनी संदर्भाधीन क्रमांक २ अन्वये, मुळ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन स्तरावरून तपासणी केल्यानंतर, रक्कम रूपये १९९.७१ लक्ष रूपये इतक्या रकमेचा सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रासोबत प्राप्त झालेल्या, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जालना यांच्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने, व्यय अग्रक्रम समिती समोर सादर केलेल्या प्रस्तावास संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये व्यय अग्रक्रम समिती, वित्त विभाग यांनी, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत, मौजे तिर्थपुरी,( ता. धनसावंगी, जि. जालना) नळ पाणी पुरवठा योजनेच्या मूळ अंदाजपत्रकीय रक्कमेवर रु. १९८.३१ लक्ष ( २७.५६ टक्के ) इतक्या वाढीस मान्यता दिली आहे. यात सुधारित अंदाजपत्रकीय रक्कमेतील वाढीव रक्कमेवरील ४% प्रशासकीय खर्च रक्कम वगळून येणाऱ्या रक्कमेनुसार सुधारित प्रशासकीय किंमतीस मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यामुळे मौजे तिर्थपुरी,(

ता. धनसावंगी, जि. जालना) नळ पाणी पुरवठा योजना, रु.१९८.३१ लक्ष इतक्या (ढोबळ) किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता मौजे तिर्थपुरी,( ता. धनसावंगी, जि. जालना) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या कामातील तांत्रिक बदलास मान्यता देऊन, रु. १९८.३१/- (अक्षरी रुपये एक कोटी अठ्यान्नव लाख एकतीस हजार फ़क्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर योजना जिल्हा परिषदेमार्फ़त कार्यान्वित करण्यात येईल.

२) योजनेची अंमलबजावणी करताना, प्रचलित शासन निर्णय/नियम, CVC तत्वे, वित्तिय मर्यादा, विहित निविदा कार्यपद्धती अनुसरणे, राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करण्याची जबाबदारी ही जिल्हा परिषद, जालना यांची राहील.

३) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रित बाबी, निविदाविषयक, क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही, अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची संबधित अंमबवजावणी यंत्रणा यांची राहील.

४) सदर योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या आदेशातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

५) तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

७) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे हस्तांतरित करुन लेखे बंद करण्यात यावेत.

८) योजना राबविणे त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान मिळणार नाही.

९) योजना पुर्नसुधारित होणार नाही, याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

१०) योजनेची उर्वरित कामे विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु.४२.८५ लक्ष (अक्षरी रुपये बेचाळीस लाख पंच्याऐंशी हजार फक्त) हा मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२६) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (२२१५ ९९४२)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र१८७/१४४३, दि.०६.१०.२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०७/ व्यय-०३, दि.२६.११.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२३१७५३३८९५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT KRISHNA MORE

Digitally signed by CHANDRAKANT KRISHNA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea427109026722812 2b638d6f2cdedad62, pseudonym=268C7E15F99BF8B492638E14751A661EBCF0233F, serialNumber=2314CF333E070F9936792BC95890FA89B2F617A931B2B577B703FA858F3DF433, cn=CHANDRAKANT KRISHNA MORE
Date: 2022.03.24 11:59:49 +05'30'

**( चं. कृ मोरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद

६) मा. विधानमंडळ सदस्य/संसद सदस्य (सर्व)
७) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना
१२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई
१३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१४) मुख्य/अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जालना
१६) निवड नस्ती (पापु-१९)